अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांना शुल्क निश्चिती व शुल्क वितरण कार्यपद्धतीबाबत.

# महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन निर्णय क्र.नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/का-१२**

मंत्रालय, मुंबई - ३२.

दिनांक: ३१ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :-**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का.१२, दि.२१.०४.२०१५.

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.३८७/का.१२, दि.२७.०६.२०१६.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे ही योजना संदर्भाधिन १ येथील दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयानुसार सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षापासून सुरू करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत आजपर्यंत उपरोक्त संदर्भाधिन तीन शासन निर्णयान्वये शाळा निवडीचे निकष तसेच शुल्क निश्चितीचे निकष ठरविण्यात आलेले आहेत. त्यानुसार दरवर्षी योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांसोबत संबंधित प्रकल्प अधिकारी रितसर करारनामा करतात. उपरोक्त प्रमाणे ज्यावर्षी विद्यार्थ्यांना योजनेंतर्गत प्रवेश देण्यात आलेला आहे, त्या वर्षाकरिता मंजूर वार्षिक शुल्क दराने संबंधित शाळांना निधी वितरीत करण्यात येतो व या तरतूदीमुळे विद्यार्थी प्रवेशित वर्षापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्याच दराने शाळांना शुल्क देय राहते. यामुळे एकाच शाळेमध्ये एकाच प्रकारच्या सोयी सुविधांचा लाभ घेत असलेल्या परंतु दोन वेगवेगळ्या शैक्षणिक वर्षात प्रवेशित विद्यार्थ्यांना वेगवेगळ्या दराने शाळांना निधी वितरीत करण्यात येत असल्यामुळे नामांकित शाळा व्यवस्थापनात एकसुत्रता दिसून येत नव्हती. काही प्रकरणांमध्ये सदर विसंगती दूर करण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने न्यायनिर्णय दिलेला असून उपरोक्त वेगवेगळ्या शुल्क रचनेमुळे लेखापरिक्षण आक्षेप देखिल नोंदविण्यात आलेला आहे. या सर्व बाबी विचारात घेऊन, दरवर्षी ऑनलाईन प्रणालीवर शाळांना प्राप्त होणाऱ्या गुणांकनाच्या आधारे निश्चित होणारे वार्षिक शुल्क संबंधित शाळेत योजनेंतर्गत प्रवेशित असलेल्या सर्व विद्यार्थ्यांकरिता मंजूर करणे आवश्यक होते, जेणेकरून अशा गुणांकनाच्या आधारे शुल्क निश्चितीमुळे सर्व विद्यार्थ्यांना एकसमान शुल्क रचना राहील आणि त्यामुळे सर्व विद्यार्थ्यांना एकसारख्या सोयी सुविधा पुरविणे शाळांना शक्य होईल. याशिवाय नामांकित शाळांमध्ये जास्तीत जास्त गुणांकन प्राप्त करण्याकरिता स्पर्धा निर्माण होऊन शाळांच्या गुणात्मक दर्जावाढीस प्रेरणा मिळेल तसेच दरवर्षी गुणांकनाच्या आधारे शुल्क रचनेत बदल होणार असल्याने शाळेचा दर्जा टिकवण्यासाठी शाळा सतत प्रयत्नशील राहील. याकरिता नामांकित योजनेंतर्गत शुल्क निश्चिती व शुल्क वितरणामध्ये एकसुत्रीपणा राहण्याच्या अनुषंगाने कार्यपद्धती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत संदर्भाधिन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेले प्रती विद्यार्थी वार्षिक शुल्क रद्द करण्यात येत आहे. **सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून** नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये प्रवेशित सर्व विद्यार्थ्यांना (विद्यार्थी प्रवेशित शैक्षणिक वर्षाचा विचार न करता) संदर्भाधिन क्र.३ येथील दि.२७.०६.२०१६ रोजीच्या व यासंदर्भातील वेळोवेळी निर्गमित शासन निर्णयामधील तरतूदीन्वये विहीत केलेल्या शैक्षणिक सोयी सुविधा व दर्जाबाबतच्या निकषांच्या आधारे ऑनलाईन प्रणालीवर संबंधित नामांकित निवासी शाळांना दरवर्षी प्राप्त होणाऱ्या गुणांकनानुसार निर्धारीत होणारे प्रती विद्यार्थी वार्षिक शुल्क मंजूर करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. नामांकित निवासी शाळा व्यवस्थापनामध्ये एकसुत्रता राहण्याच्या अनुषंगाने शुल्क निश्चिती व शुल्क वितरणाबाबत खालीलप्रमाणे कार्यपद्धती राबविण्यात यावी. :-

**अ) <u>शुल्क निश्चितीसाठी कार्यपध्दती :-</u>**

१) नामांकित योजनेंतर्गत संबंधित वर्षात शाळेची निवड करण्यापूर्वी सर्व नामांकित शाळांचे नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात यावे.

२) शासनाने विहीत केलेल्या निकषाच्या आधारे शाळांनी ऑनलाईन प्रणालीवर भरलेल्या माहितीची प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त यांनी प्रत्यक्ष तपासणी / पाहणी करून खात्री करावी.

३) ऑनलाईन प्रणालीवर शाळांमार्फत भरलेल्या माहितीच्या आधारे प्राप्त गुणांकनांच्या (System Generated) समोर प्रत्यक्षात उपलब्ध सोयी सुविधांच्या खात्री करून त्याआधारे अपर आयुक्त यांनी ऑनलाईन प्रणालीद्वारे गुणांकन करावे.

४) आयुक्त, आदिवासी विकास यांनी अपर आयुक्तांनी केलेले गुणांकन तपासून प्रस्ताव सचिव स्तरीय समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

५) सचिव स्तरीय समितीच्या समोर याविषयी पडताळणी करून शाळेची निवड व गुणांकन अंतीम करण्यात येईल.

६) संबंधित वर्षासाठी अंतीम केलेल्या गुणांकनानुसार संबंधित शाळांचे त्या वर्षाकरिताचे शुल्क निर्धारीत करण्यात येतील.

७) योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांचे दरवर्षी गुणांकन होणार असल्याने एखाद्या वर्षांत प्राप्त गुणांनुसार प्रती विद्यार्थी मंजूर होणारे शुल्क हे त्या वर्षाकरिताच देय राहतील.

८) संबंधित वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या दराने मागील वर्षातील कोणत्याही थकबाकीची नामांकित शाळेस मागणी करता येणार नाही.

**ब) <u>विद्यार्थी नोंदणी</u>-:**

१) नामांकित योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या संगणकीय प्रणालीवर शाळेमार्फत दि.३१ जुलै पर्यंत विद्यार्थ्यांचे आधार पडताळणी करून नोंदणी करणे आवश्यक आहे.

२) नामांकित शाळेत ज्या प्रकल्प अधिकाऱ्यांनी विद्यार्थ्यांना प्रवेश दिलेला असेल, त्या प्रकल्प अधिकाऱ्याने शाळेमधील विद्यार्थ्यांची ऑनलाईन नोंदणी व प्रत्यक्ष उपस्थितीबाबत पडताळणी करून त्यास दि.१० ऑगस्ट पर्यंत ऑनलाईन मंजूरी द्यावी.
३) प्रकल्प अधिकाऱ्यांनी मंजूर केलेल्या नोंदणीची संबंधित अपर आयुक्त यांनी दि.२० ऑगस्ट पर्यंत तपासणी करून त्यास मंजूरी द्यावी.
४) नोंदणीकृत विद्यार्थी संख्येची खात्री करून संबंधित शाळेस मंजूरी दिलेल्या अंतीम गुणांकनानुसार आयुक्त, आदिवासी विकास यांच्यामार्फत निधी वितरीत करण्यात यावा.
५) नामांकित शाळा ज्या प्रकल्प अधिकाऱ्यांच्या कार्यक्षेत्रात आहेत, तेथील प्रकल्प अधिकारी यांनी प्रत्येक तिमाहीस शाळेस भेट देऊन शाळेतील शैक्षणिक सुविधा, प्रत्यक्ष विद्यार्थ्यांची उपस्थितीबाबतचा अहवाल अपर आयुक्त यांच्यामार्फत आयुक्त, आदिवासी विकास यांना सादर करावा.

**क) <u>शुल्क वितरणाची कार्यपध्दती -:</u>**

१) ऑनलाईन प्रणालीवर संबंधित शाळांचे तयार होणारे देयक अपर आयुक्त यांनी साक्षांकित करून त्यानुसार निधी वितरणाकरिता आयुक्त, आदिवासी विकास यांना ऑनलाईन प्रणालीमार्फत दि.२० ऑगस्ट पर्यंत सादर करावे.
२) संबंधित शाळेस प्राप्त गुणांकनानुसार निश्चित होणारे वार्षिक शुल्क दराने नोंदणीकृत विद्यार्थ्यांच्या संख्येनुसार संबंधित शाळांना ऑनलाईन प्रणालीमार्फत आयुक्त, आदिवासी विकास यांच्या स्तरावरून थेट रक्कम वितरीत करण्यात यावी.
३) नामांकित शाळांना खालीलप्रमाणे दोन हप्त्यात निधी वितरीत करण्यात यावा.
   I. पहिला हप्त्यामध्ये संबंधित शाळांना गुणांकनानुसार निश्चित होणाऱ्या एकूण रकमेच्या ५०% रक्कम शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीला विद्यार्थी प्रवेशाची ऑनलाईन नोंदणीची खात्री झाल्यानंतर माहे ऑगस्ट मध्ये वितरीत करण्यात यावी.
   II. दुसऱ्या हप्त्यामध्ये उर्वरीत ५० टक्के रक्कम संबंधित शाळेमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रत्यक्षात उपस्थिती तपासून माहे डिसेंबर मध्ये वितरीत करण्यात यावी.

३. उपरोक्त परिच्छेदामध्ये नमूद केलेले शुल्क निश्चिती व शुल्क वितरणाबाबत कार्यपद्धती योजनेच्या संगणकीय प्रणालीमार्फत (https://namankit.mahaonline.gov.in) ऑनलाईन पध्दतीने राबविण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०९०११२४४३८९७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.09.01 12:34:34 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरिक्षा / महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
९. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / प्रशासकीय भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई.
१२. सर्व उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
१४. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१५. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी मंत्रालय, मुंबई-३२.
१६. निवड नस्ती, का-१२.